नागपूर येथे विधीमंडळाच्या हिवाळी अधिवेशनाच्या कामासाठी जाणा-या कर्मचा-यांना वाढीव दराने दैनिक भत्ता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक-प्रवास-१०९८/प्र.क्र.७७/९८/सेवा-५,
शि.का. नागपूर, दिनांक :- २३/१२/१९९८.

पहा :-१] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-प्रवास-१०९२/सीआर-५९/सेवा-५, दिनांक १ एप्रिल, १९९२.
२] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-प्रवास-१०९७/प्र.क्र. १/सेवा-५, दिनांक १/१/१९९७.
३] शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-प्रवास-१०९८/प्र.क्र. ९/सेवा-५, दिनांक ४/२/१९९८.

शासन निर्णय.
==========

विधीमंडळाचे नागपूर येथील अधिवेशन कालासाठी जाणा-या अधिकारी/कर्मचारी यांना द्यावयाच्या दैनिक भत्त्यात वाढ करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता, त्यानुसार दिनांक १/१/९७ च्या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या भत्त्यामध्ये नागपूर येथील अधिवेशन कालावधीसाठी सरसकट रु. १५ ची वाढ करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. आता दैनिक भत्त्याचे सुधारीत दर खालीलप्रमाणे राहतील.

| वेतन मर्यादा [ विधमान वेतन श्रेणीनुसार. ] | १९९६ च्या नागपूर अधिवेशन काळातील वित्त विभागाच्या दि. १/१/९७ अन्वये दैनिक भत्त्याचा दर [ प्रतिदिन. ] | या आदेशान्वये आता मंजूर करण्यात आलेले सुधारीत दैनिक भत्ता दर [ प्रति दिन ] |
|---|---|---|
| [ रुपये ] | [ रुपये ] | [ रुपये ] |
| १] २८०० व त्याहून अधिक | ११५ | १३० |
| २] १९०० – २७९९ | १०५ | १२० |
| ३] १९०० पेक्षा कमी | १०० | ११५ |

या आदेशानुसार दैनिक भत्ता प्रदान करण्यासाठी होणारा खर्च संबंधीत विभागानी आपापल्या मंजूर अनुदानातून भागवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

[ सु. सा. गायकवाड ]
उप सचिव, वित्त विभाग.

प्रत :-

१] महालेखापाल-१ [ लेखा व अनुज्ञेयता ] महाराष्ट्र, मुंबई
२] महालेखापाल-२ [ लेखा व अनुज्ञेयता ] महाराष्ट्र, नागपूर.
३] महालेखापाल-१ [लेखा परिक्षा ], महाराष्ट्र, मुंबई.
४] महालेखापाल-२ [लेखा परिक्षा ], महाराष्ट्र, नागपूर.
५] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६] निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
७] राज्यपालांचे सचिव.
८] मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव.
९] उपमुख्यमंत्र्यांचे सचिव.
१०] सर्व मंत्र्यांचे व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक.
११] सर्व मंत्रालयीन विभाग.
१२] सर्व विभागीय आयुक्त.
१३] सर्व जिल्हाधिकारी.
१४] सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१५] वित्त विभागातील सर्व कार्यासने.
१६] सर्व कोषागार अधिकारी.
१७] निवड नस्ती, सेवा-५.